**मंत्रालयीन विभागातील गट ड संवर्गातील कर्मचाऱ्यांना लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देताना तसेच वाहन चालक पदावरुन लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्ती देतांना अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०५ डिसेंबर, २०१८

**पहा** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२-८५/तेरा, दि.१५.४.१९९१
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२-८५/तेरा, दि.११.६.१९९१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२-८५/तेरा, दि.२९.६.१९९३
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.आरटीआर-१४०३/८४/प्र.क्र.५४/०३/१३, दि.१०.५.२००५
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.साजेलि-१११४/प्र.क्र.६/१४-अ, दि. २०.०२.२०१४
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१, दि.१४.०१.२०१६
७) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र.आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/१४-अ, दिनांक २१.०२.२०१८

**परिपत्रक**

संदर्भाधीन क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयानुसार एस.एस.सी. अथवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व चतुर्थश्रेणीमध्ये तीन वर्षे सलग सेवा पूर्ण झालेल्या व टंकलेखनातील आवश्यक गती (प्र.मि.४० शब्द इंग्रजी किंवा ३० शब्द मराठी) असल्याचे नियमानुसार विहित केलेले प्रमाणपत्र (शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र (गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट)) धारण केलेल्या कर्मचाऱ्यांना तृतीय श्रेणीतील त्या विशिष्ट वर्षी रिक्त झालेल्या लिपिक-टंकलेखक पदांच्या २५% पदावर पदोन्नती देण्याची तरतूद होती. संदर्भाधीन क्र.४ येथील शासन परिपत्रकान्वये गट ड मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट क मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देताना प्रतिवर्षी रिक्त होणाऱ्या पदांच्या २५ टक्के पदांऐवजी लिपिक-टंकलेखक संवर्ग संख्येच्या एकूण मंजूर पदसंख्येच्या २५ टक्के पदावर पदोन्नती देण्याचा निर्णय घेण्यात आला. संदर्भाधीन क्र.५ येथील शासन परिपत्रकान्वये गट ड मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट क मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देताना अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. संदर्भाधीन क्र.६ येथील शासन निर्णयान्वये गट ड मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट क मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देताना लिपिक-टंकलेखक संवर्ग संख्येच्या एकूण मंजूर पदसंख्येच्या ५० टक्के पदावर पदोन्नती देण्याचा निर्णय घेण्यात आला, त्याचप्रमाणे वाहनचालक पदावरुन गट-क संवर्गातील लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती देण्याच्या संदर्भात सेवाप्रवेश नियमात आवश्यक सुधारणा करण्यात येतील असा निर्णय घेण्यात आलेला आहे. संदर्भाधीन क्रमांक ७ येथील शासन अधिसूचनेनुसार बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१८ दिनांक २१-०२-२०१८ अनुसार लिपिक-टंकलेखक गट-क पदावर पदोन्नतीने, अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसह नामनिर्देशनाने व वाहनचालकामधून कायमस्वरुपी बदलीने करावयाची नियुक्ती यांचे प्रमाण ४०:५०:१० असे निर्धारित केलेले असून शैक्षणिक पात्रता पदवी अशी करण्यात आली आहे. अधिसूचनेतील नियम क्रमांक ३ अनुसार लिपिक-टंकलेखक पदावरील नियुक्ती करीताचे निकष निश्चित करण्यात आलेले आहेत.

२. संदर्भाधीन क्र.५ येथील शासन परिपत्रकान्वये गट ड मधील पात्र कर्मचाऱ्यांना गट क मधील लिपिक-टंकलेखक या पदावर पदोन्नती देताना अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सूचना देण्यात आलेल्या असून शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३ /१४-अ, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१८

अधिनियमित झाल्यानुसार त्याअनुषंगाने गट ड मधून लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देताना तसेच वाहन चालक पदावरुन लिपिक-टंकलेखक पदावर बदलीने नियुक्ती देतांना खाली नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल:-

अ) मंत्रालयीन विभागातील गट-ड मधील कर्मचारी यांच्यामधून पदोन्नतीव्दारे:-

१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/१४-अ, दिनांक २१-०२-२०१८ नुसार बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१८ दिनांक २१-०२-२०१८ पासून अधिनियमीत करण्यात आला असल्याने सन २०१८ करीता मंत्रालयीन विभागातील गट ड मधील ज्या कर्मचाऱ्यांनी लिपिक-टंकलेखक पदावरील पदोन्नतीसाठी अर्हता दिनांक २१-०२-२०१८ पर्यंत धारण करीत असतील त्यांची दिनांक २१-०२-२०१८ रोजीची ज्येष्ठता सूची तयार करुन त्या आधारे लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून करण्यात येईल.

२) तद्नंतर मंत्रालयीन विभागातील गट ड मधील जे कर्मचारी लिपिक-टंकलेखक पदावरील पदोन्नतीसाठी अर्हता धारण करतील त्यांची दिनांक २१-०२-२०१८ नंतरच्या प्रत्येक वर्षी दिनांक १ जानेवारी रोजीची ज्येष्ठता सूची तयार करुन त्या आधारे लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून करण्यात येईल.

३) सदर ज्येष्ठतासूचीमध्ये पदवी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व चतुर्थश्रेणीमध्ये तीन वर्षे नियमित सेवा पूर्ण केलेल्या व टंकलेखनातील आवश्यक गती (मराठी ३० शब्द प्र.मि. किंवा इंग्रजी ४० शब्द प्र.मि.) असल्याचे नियमानुसार विहित केलेले प्रमाणपत्र (शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र (गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट)) किंवा संगणक टंकलेखनाचे प्रमाणपत्र धारण केलेल्या कर्मचाऱ्यांचा समावेश असेल.

ब) मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गातील कर्मचारी यांच्यामधून बदलीने:-

१) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/१४-अ, दिनांक २१-०२-२०१८ नुसार बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लिपिक-टंकलेखक गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१८ दिनांक २१-०२-२०१८ पासून अधिनियमीत करण्यात आला असल्याने सन २०१८ करीता मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गामधील जे कर्मचारी लिपिक-टंकलेखक पदावरील बदलीने नियुक्तीसाठी इच्छुकता देऊन दिनांक २१-०२-२०१८ पर्यंत अर्हता धारण करीत असतील त्यांची दिनांक २१-०२-२०१८ रोजीची ज्येष्ठता सूची तयार करुन त्या आधारे लिपिक-टंकलेखक पदावर ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर कायमस्वरुपी संवर्ग बदलीने नियुक्ती देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून करण्यात येईल.

२) तद्नंतर मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गामधील जे कर्मचारी लिपिक-टंकलेखक पदावरील बदलीने नियुक्तीसाठी इच्छुकता देऊन अर्हता धारण करीत असतील त्यांची दिनांक २१-०२-२०१८ नंतरच्या प्रत्येक वर्षी दिनांक १ जानेवारी रोजीची ज्येष्ठता सूची तयार करुन त्या आधारे लिपिक-टंकलेखक पदावर ज्येष्ठता अधीन पात्रता या निकषावर कायमस्वरुपी संवर्ग बदलीने नियुक्ती देण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून करण्यात येईल.

३) सदर ज्येष्ठतासूचीमध्ये पदवी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व वाहनचालक संवर्गामध्ये तीन वर्षे नियमित सेवा पूर्ण केलेल्या व टंकलेखनातील आवश्यक गती (मराठी ३० शब्द प्र.मि. किंवा इंग्रजी ४० शब्द प्र.मि.) असल्याचे नियमानुसार विहित केलेले प्रमाणपत्र (शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र (गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट)) किंवा संगणक टंकलेखनाचे प्रमाणपत्र धारण केलेल्या कर्मचाऱ्यांचा समावेश असेल.

४. गट ड मधील कर्मचाऱ्यांना गट क मधील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नती देण्याची कार्यवाही ही सामान्य प्रशासन विभागाकडून करण्यात येणार असली तरी वाहनचालक तसेच गट ड सवर्गातील कर्मचाऱ्यांची नियुक्ती, त्यांची ज्येष्ठतासूची तसेच गट ड संवर्गातून गट ड संवर्गातील पदावरील पदोन्नतीची कार्यवाही ही पूर्वीप्रमाणेच संबंधित मंत्रालयीन विभागाने करावयाची आहे.

५. सर्व मंत्रालयीन विभागांनी दिनांक २१-०२-२०१८ च्या ज्येष्ठतासूचीकरीता दिनांक २१-०२-२०१८ रोजी लिपिक-टंकलेखक पदावरील पदोन्नतीसाठी अर्हता धारण करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील गट ड मधील कर्मचाऱ्यांची नावे सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये तसेच मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गामधील जे

**कर्मचारी लिपिक-टंकलेखक पदावरील बदलीने नियुक्तीसाठी इच्छुकता देऊन अर्हता धारण करीत असतील त्यांची नावे सोबत जोडलेल्या प्रपत्र-ब मध्ये दिनांक २१ डिसेंबर, २०१८ पर्यंत कळवावित.**

**६. तद्नंतर प्रत्येक वर्षी दिनांक ३१ डिसेंबर रोजी लिपिक-टंकलेखक पदावरील पदोन्नतीसाठी अर्हता धारण करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील गट ड मधील कर्मचाऱ्यांची नावे सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये तसेच मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गामधील जे कर्मचारी लिपिक-टंकलेखक पदावरील बदलीने नियुक्तीसाठी इच्छुकता देऊन अर्हता धारण करतील त्यांची नावे सोबत जोडलेल्या प्रपत्र-ब मध्ये प्रत्येक वर्षी जानेवारी महिन्याच्या पहिल्या आठवडयामध्ये भरुन सामान्य प्रशासन विभागास कळवावीत.**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा **संगणक सांकेतांक** २०१८१२०५१५०५३६५८०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.05 15:12:11 +05'30'

(ग.भि.गुरव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र :- प्रपत्र-अ, प्रपत्र-ब.

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२. मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय,
३. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
४. सह / उप सचिव (आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग.
५. सह / उप सचिव, कार्यासन-१२, १६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती
७. का.१४-अ, संग्रहार्थ

प्रपत्र-अ

| मंत्रालयीन विभागातील गट ड संवर्गातून मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी दिनांक २१-०२-२०१८ /१ जानेवारी, रोजी पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांची यादी | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | गट-ड मधील कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | विभागाचे नाव | कर्मचाऱ्याचा जात प्रवर्ग | जन्म दिनांक | गट-ड मधील नियुक्तीचा दिनांक | नियुक्ती प्रवर्ग | पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | मराठी ३० श.प्र.मि. / इंग्रजी ४० श.प्र.मि. टंकलेखनाची शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र / संगणक टंकलेखन प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | एमएससीआयटी संगणक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | लिपिक-टंकलेखक पदावर पदोन्नतीसाठी पात्र झाल्याचा दिनांक | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |

**प्रपत्र-ब**

| मंत्रालयीन विभागातील वाहनचालक संवर्गातून मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखक पदावर संवर्गबाहय बदलीने नियुक्तीसाठी दिनांक २१-०२-२०१८ /१ जानेवारी, रोजी पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांची यादी | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | वाहनचालक संवर्गामधील कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | विभागाचे नाव | कर्मचाऱ्याचा जात प्रवर्ग | जन्म दिनांक | वाहनचालक संवर्गामधील नियुक्तीचा दिनांक | नियुक्ती प्रवर्ग | पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | मराठी ३० श.प्र.मि. / इंग्रजी ४० श.प्र.मि. टंकलेखनाची शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र / संगणक टंकलेखन प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | एमएससीआयटी संगणक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | लिपिक-टंकलेखक पदावर संवर्गबाहय बदलीने नियुक्तीसाठी पात्र झाल्याचा दिनांक | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |